**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक मातंसं/नस्ती०९/१४/३९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक: १ जून, २००९**

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान विभागाने भूमि अभिलेख, परिवहन, मालमत्ता नोंदणी, कृषि, पोलिस, रोजगार व स्वयंरोजगार, कोषागारे, महानगरपालिका, ग्राम पंचायत, वाणिज्य कर असे महत्वाचे संगणकीकरणाचे प्रकल्प मिशन मोड प्रोजेक्ट म्हणून घोषित केले आहेत. सदर प्रकल्प राबविण्यासाठी कॅपॅसिटी बिल्डींग,स्टेट वाईड एरिया नेटवर्क आणि स्टेट डेटा सेंटर याबाबी अत्यावश्यक असल्याने या प्रयोजनासाठी राज्याला निधी उपलब्ध करुन देण्याचे केंद्र शासनाने ठरविले आहे. स्टेट डेटा सेंटरची स्थापना करण्यास केंद्र शासनाने मान्यता दिली आहे. या प्रकल्पाद्वारे राज्यातील ई-गव्हर्नन्स प्रकल्पांसाठी राज्य मुख्यालयात अत्यंत उच्च दर्जाचे डेटा सेंटर उभारण्यात येणार आहे. सदर प्रकल्प राबविण्यासाठी पाच वर्षाच्या कालावधीत राज्यास रु.५५.७७ कोटी इतका निधी मंजुर केला असून त्यापैकी पहिला टप्यात ४.१९ कोटी इतका निधी राज्यास उपलब्ध करुन दिलेला असून अतिरिक्त केंद्रीय आर्थिक सहाय्य म्हणुन रु. ७.४८ कोटी इतका निधी उपलब्ध होणार आहे. सदर प्रकल्प राबविण्यासाठी केद्र शासनाने मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या असून त्यानुसार पुढील प्रमाणे कार्यवाही करण्यात आली आहे.

i) उपलब्ध करुन देण्यात आलेला निधीचा उपयोग स्टेट डेटा सेंटरची स्थापना करण्यासाठी करावयाचा आहे.

ii) सदर प्रकल्प शासनाची सोसायटी अथवा कंपनीच्या माध्यमातून राबविणे केंद्रशासनाने बंधनकारक केल्याने, महाराष्ट्र राज्यात सेतु महाराष्ट्र या सोसायटीकडून सदर प्रकल्प राबविण्याचे ठरविण्यात आलेला आहे. केंद्र शासनाकडून या प्रकल्पाखाली निधी प्राप्त करण्यासाठी सेतु महाराष्ट्र सोसायटीचे स्वतंत्र खाते युनियन बँक ऑफ इंडिया, नरिमन पॉईंट, मुंबई येथे उघडण्यात आले आहे. या प्रकल्पासाठी केंद्र शासनाकडून निधी सदर खात्यात वेळोवेळी जमा आहे.

iii) सदर प्रकल्पा अंतर्गत राज्यातील विविध विभागाकडून मागणीप्रमाणे डाटा व ॲप्लीकेशन ठेवण्यासाठी जागा उपलब्ध करुन द्यावयाची आहे.

iv) उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा उपयोग प्रामुख्याने स्टेट डाटा सेंटर साठी आवश्यक असलेल्या Active & Passive Components ची खरेदी, स्थापना व कार्यान्वित करणे तसेच ५ वर्षांच्या कालावधीसाठी यशस्वीरित्या राबविणे यावरील खर्च भागविण्यासाठी करावयाची आहे.

v) केंद्र शासनाने नेमणूक केलेल्या सल्लागार मे.पी.डब्ल्यु.सी. या संस्थेसोबत केंद्र शासनाकडुन प्राप्त झालेल्या अटी व शर्ती नुसार रितसर प्रकल्प राबविण्याबाबत करार करण्यात आलेला आहे.

vi) प्रकल्प राबविणारी संस्था निवडण्यासाठी निविदेला (RFP) अंतिम रुप देवुन त्याची मान्यता घेण्यात आलेली आहे.

vii) प्रकल्प राबविण्यासाठी लागणारी जागा व त्याच्या लेआऊट प्लॅनची मार्गदर्शक सूचनांनुसार केंद्र शासनाकडुन मान्यता घेण्यात आलेली आहे.

viii) स्टेट डेटा सेंटर ही अत्यंत महत्वाची पायाभुत सुविधा असल्याने त्याच्या सुरक्षिततेसाठी केंद्रशासनाकडुन निर्गमित होणाऱ्या सूचनेन्वये कार्यवाही प्रकल्प राबविण्यासाठी निवडून आलेल्या संस्थेकडून माहिती तंत्रज्ञान संचालनालयाच्या देखरेखीखाली (Supervission) केली जाणार आहे.

ix) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार स्टेट डेटा सेंटर प्रकल्प राबविण्यासाठी अंमलबजावणी समितीची स्थापना शासन निर्णय मातंसं/नस्ती-०६/१४/३९, दि. २६.८.२००८ अन्वये करण्यात आलेली

आहे. सदर समितीत राज्य शासनाच्या अधिकाऱ्यांव्यतिरिक्त केंद्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान विभागाचे प्रतिनिधी, एनआयसी चे प्रतिनिधी व बाहेरील तज्ञ नेमण्यात आलेले आहेत.

सदर प्रकल्प उभारुन पाच वर्ष चालविण्यासाठी खुल्या निविदा मागविण्यात आल्या आहेत. त्यानुसार प्राप्त होणाऱ्या निविदांपैकी प्रि-कॉलिफीकेशनमध्ये यशस्वी होणाऱ्या संस्थेच्या तांत्रिक निविदा उघडण्यात येतील. उघडण्यात येणाऱ्या तांत्रिक निविदांचे मुल्यांकन करण्यासाठी तांत्रिक समिती गठीत करण्याबाबत प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णया अन्वये खालील प्रमाणे तांत्रिक समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | प्रो.डी.बी.फाटक, आयआयटी,पवई | - अध्यक्ष |
| २) | अपर मुख्य सचिव ( वित्त) किंवा त्यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| ३) | प्रधान सचिव (महसूल) किंवा त्यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| ४) | सचिव (मा.तं.) सामान्य प्रशासन विभाग | - सदस्य |
| ५) | विकास आयुक्त (उद्योग) किंवा त्यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| ६) | केंद्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान विभागाचे प्रतिनिधी | - सदस्य |
| ७) | मे. PWC (प्रकल्प सल्लागार) | - सदस्य |
| ८) | डॉ.एस.एस.मंथा, SNDT/VJTI, मुंबई | - सदस्य |
| ९) | श्री. एम.व्ही.श्रीराम, एचपीसीएल | - सदस्य |
| १०) | राज्य सूचना विज्ञान अधिकारी,एसआयसी, नवीन प्रशासन भवन, मुंबई | - सदस्य |
| ११) | संचालक (मातं) माहिती तंत्रज्ञान संचालनालय | - सदस्य सचिव |

२. **तांत्रिक समितीची कार्यकक्षा:-**

सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी प्राप्त झालेल्या तांत्रिक निविदांचे मुल्यांकन करुन यशस्वी निविदाकारांच्या व्यापारी निविदा उघडण्याबाबत निर्णय घेणे.

या शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक सांकेतांक २००९०६०११३४८००००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**(प्र. दि. सोहळे)**
**शासनाचे उप सचिव,तथा संचालक (माहिती तंत्रज्ञान)**

**प्रति**

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्यसचिव यांचे खाजगी सचिव,
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा) मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा) मुंबई,

प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,(विधान परिषद /विधान सभा),मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / लेखा कोष भवन वांद्रे (पू.) मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषद/महानगरपालिकांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व नगरपरिषदांचे मुख्याधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई ४०० ००४, संचालक,शासकीय मुद्रण व लेखनसामग्री,मुंबई
विशेष आयुक्त व प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन,महाराष्ट्र सदन,कोपरनिकस मार्ग,नवी दिल्ली
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
प्रो. डी. बी. फाटक, आयआयटी, मुंबई
श्री. एस. पी. सिंग, डिआयटी, नवी दिल्ली
मे. PWC (प्रकल्प सल्लागार)
डॉ.एस.एस.मंथा, SNDT/VJTI, मुंबई
श्री. एम.व्ही.श्रीराम, एचपीसीएल
श्री. मोईज हुसेन, राज्य सूचना विज्ञान अधिकारी,एसआयसी, नवीन प्रशासन भवन,मुंबई
निवड नस्ती (२ प्रती).

*****